**<u>महाराष्ट्र खनिज विकास निधी अंतर्गत चंद्रपूर जिल्ह्यातील ऊर्जा नगर येथील पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव खर्चास मान्यता देण्याबाबत.</u>**

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अशावि-१००८ / प्र.क्र. २५४७ /उद्योग-९

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ३०.१०.२०१४

**<u>वाचा</u>**

1) **शासन निर्णय क्रमांकः** अशावि-१००८/प्र.क्र. २५४७/उद्योग-९, दिनांक २५.०३.२०१३

**<u>प्रस्तावना</u>**

महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजना) निधी अधिनियम २००१ अन्वये महाराष्ट्र खनिज विकास निधीची निर्मिती करण्यात आली आहे. या निधीतून हाती घ्यावयाच्या कामांसंदर्भात सुधारित मार्गदर्शक तत्वे विहीत करणारा शासन निर्णय दि. ०१.०८.२०१२ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. विधीमंडळात राज्य शासनाने दिलेल्या आश्वासनाच्या पूर्तीच्या दृष्टीने चंद्रपूर जिल्ह्यातील आश्वासित पाणी पुरवठा योजनेच्या कामांना विशेष बाब म्हणून खनिज विकास निधीतून संदर्भ क्रमांक १ येथे नमूद दिनांक २५.०३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये रुपये ५११.२७ लक्ष किंमतीच्या योजनेस मान्यता देण्यात आली होती. चंद्रपूर जिल्ह्यातील ऊर्जानगर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्राकानुसार येणा-या वाढीव खर्चास मान्यता देण्याचा प्रस्ताव सदर नस्तीवर विचाराधीन होता.

## शासन निर्णय

चंद्रपूर जिल्हातील ऊर्जा नगर पाणी पुरवठा योजनेचा अंदाजित खर्च सन *२००९ -१०* च्या दरपत्राकानुसार रुपये *५११.२७* लक्ष इतका होता. सन *२०१३-१४* च्या सुधारित दर सूचीनुसार सदर योजनेचा खर्च रुपये *८७८.६५* लक्ष इतका येत असून वाढीव रुपये *३६७.३८* लक्ष एवढ्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रयोजनावरील खर्च मागणी क्र.के-७ मुख्यलेखाशीर्ष "२८५३, अलोह खनिकर्म व धातुविषयक उद्योग-०२ खाणींचे विनियमन व विकास- १०२ खनिज समन्वेषण-(००)(०५)" खनिज विकास (योजनेतर)(२८५३ ०१३ २) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व या शीर्षाखाली मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागाविण्यात यावा.

३. महाराष्ट्र खनिज विकास निधीतून मंजूर करण्यात आलेली कामे कार्यान्वयन यंत्रणांनी विना आकारणी तत्वावर करावयाची आहेत.

४. या कामांसाठी निधी वितरणास मान्यता मिळाल्याशिवाय या प्रयोजनावर खर्च करता येणार नाही.

५. कार्यान्वयन यंत्रणेने सक्षम स्तरावरून या कामांना तांत्रिक मान्यता दिल्यानंतरच महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळाकडे निधीची मागणी करावी.

६. या प्रकरणाचा पूर्वोदाहरण म्हणून वापर करण्यात येऊ नये.

७. उपरोक्त मान्यता देण्यात आलेल्या अंदाजित खर्चाच्या मर्यादेतच खनिज विकास निधीतून निधी उपलब्ध करून देण्यात यावा.

८. सदर प्रशासकीय मान्यता महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजना) निधी अधिनियम २००१ च्या कलम ७ (१) मधील तरतूदीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४१०२९१०५७१५५४१०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2014.10.30 15:20:07 +05'30'

**( संजय इंगळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्या., नागपूर
२. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर
३. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई
४. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, इमारत -अ॰ पहिला माळा, सी.पी.क्लब जवळ, सिव्हील लाईन्स , नागपूर - ४४० ००१.
५. निवडनस्ती (उद्योग-९)